शिर्डी, ता. राहाता जि. अहमदनगर येथे अपर जिल्हाधिकारी कार्यालय सुरू करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राफेब-२०२२/प्र.क्र.९१/ म-१०**
मंत्रालय, पहिला माळा, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
तारीख: ०५ जुलै, २०२३

**वाचा**

**विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. मशा/कार्या/२/५/३७११३/२०२२/ जा.क्र.१५४८६, दिनांक २२.११.२०२२.**

**प्रस्तावना:-**

अहमदनगर जिल्हा हा राज्यातील सर्वात जास्त क्षेत्रफळ असलेला जिल्हा आहे. सद्यस्थितीत जिल्हास्तरीय महसूल विभगाशी निगडीत सर्व कामकाजांसाठी नागरीकांना जिल्हा मुख्यालयी जाणे भाग पडते सबब नागरीकांची सोय विचारात घेता, तसेच शासकीय योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने शिर्डी ता. राहाता, जि. अहमदनगर येथे स्वतंत्र अपर जिल्हाधिकारी कार्यालय स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

शिर्डी, ता. राहाता, जि. अहमनगर येथे अपर जिल्हाधिकारी कार्यालय सुरू करण्यास व सदर कार्यालयासाठी दि.१३.०६.२०२३ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीतील मान्यतेनुसार खालील ६ पदे नियमित वेतनश्रेणीवर मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर पदे ही सध्याच्या त्या-त्या संवर्गाचा एक भाग राहतील.

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी | मंजूर पदांची संख्या | एकुण |
|---|---|---|---|---|
| १ | अपर जिल्हाधिकारी | एस- २५-७८,८००-२,०९,२००/- | १ | १ |
| २ | नायब तहसिलदार | एस- १४-३८६००-१,२२,८००/- | १ | १ |
| ३ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | एस- १४-३८,६००- १,२२,८००/- | १ | १ |
| ४ | अव्वल कारकून | एस- १२-३२,०००-१,०१,६००/- | १ | १ |
| ५ | लिपीक टंकलेखक | एस- ०६- १९,९००-६३,२००/- | २ | २ |
| | | **एकुण** | **६** | **६** |

०२. अपर जिल्हाधिकारी कार्यालय, अहमदनगर तसेच अपर जिहाधिकारी कार्यालय, शिर्डी यांच्या कार्यक्षेत्रात खालीलप्रमाणे तालुके राहतील.

| अ.क्र | कार्यालयाचे नाव | तालुके | एकुण तालुके |
|---|---|---|---|
| १ | अपर जिल्हाधिकारी कार्यालय, अहमदनगर | नेवासा, शेवगाव, पाथर्डी, अहमदनगर, पारनेर, श्रीगोंदा, कर्जत, जामखेड | ८ |
| २ | अपर जिल्हाधिकारी कार्यालय, शिर्डी | कोपरगाव, राहाता, श्रीरामपूर, संगमनेर, अकोले, राहूरी | ६ |

०३. अहमदनगर जिल्ह्यातील अपर जिल्हाधिकारी कार्यालय, अहमदनगर तसेच अपर जिल्हाधिकारी कार्यालय, शिर्डी यांच्या कार्यक्षेत्रातील तालुके, त्याअंतर्गत महसूल मंडळे, तलाठी साझे व त्यामध्ये अंतर्भूत होणाऱ्या गावांची यादी प्रसिद्ध करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे स्तरावर करण्यात यावी.

०४. अपर जिल्हाधिकारी, शिर्डी, ता. राहाता, जि. अहमदनगर यांचे प्रतिवेदन अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, अहमदनगर आणि नियंत्रक अधिकारी म्हणून विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक हे काम पाहतील.

०५. अपर जिल्हाधिकारी, शिर्डी, ता. राहाता, जि.अहमदनगर यांना या शासन निर्णयान्वये कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०६. महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम १३ पोटकलम (३) अन्वये प्राप्त अधिकारांनुसार, जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना प्रदान करण्यात आलेल्या शक्ती अपर जिल्हाधिकारी, शिर्डी यांना त्यांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रापुरत्या प्रदान करण्याबाबत स्वतंत्रपणे अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

०७. अहमदनगर जिल्ह्यात शिर्डी येथे अपर जिल्हाधिकारी कार्यालय स्थापन करण्याकरिता येणारा खर्च “मागणी क्र. सी-१, २०५३, जिल्हा प्रशासन, ०९४ - इतर आस्थापना, (०१) उप विभागीय आस्थापना, (०१) (०२) विभागीय आयुक्त नाशिक (अनिवार्य), संगणक सांकेतांक (२०५३ ०१७१) ” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. मंजूर तरतूद अपुरी पडत असल्यास आठमाही अंदाजपत्रक सादर करताना वाढीव तरतूदीची मागणी करावी व ते शक्य नसल्यास पूरक मागणीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

०८. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २३२/आपुक, दि.०२/०५/२०२३ व नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीने दि.०६/०३/२०२३ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार तसेच मंत्रीमंडळाच्या दि.१३/०६/२०२३ च्या बैठकीत प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०५१६४७११९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH
VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2023.07.05 16:48:03 +05'30'

**( संतोष वि. गावडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री महसूल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (र.व का), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव (नियोजन),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.विभागीय आयुक्त, नाशिक.

१५. जिल्हाधिकारी, अहमदनगर.

१६. अपर जिल्हाधिकारी, शिर्डी जिल्हा अहमदनगर.

१७. उपविभागीय अधिकारी,शिर्डी, जिल्हा अहमदनगर.

१८. संबंधित तहसिलदार, जिल्हा अहमदनगर.

१९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.

२०. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

२१. कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग ( कार्यासन ई-१/ ई-८/ ई-९/ ई-१०/ ब-१/ज-६)

२२. वित्त विभाग (का. विसू-१/ अर्थसंकल्प -६/ व्यय-९/ आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.

२३. महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने.

२४. निवड नस्ती-कार्यासन म-१०.